# वादळाची गोष्ट

अनुवादः अनुजा सामंत



# वादळाची गोष्ट

अनुवाद: अनुजा सामंत



एक दिवस गावामध्ये असा उजाडला. सगळ्यांना उन्हाळ्याचा त्रास होत आहे. गवत सुकले आहे. बटरकपची फुले धुळीने माखली आहेत. डेजीची पांढरी फुलेही करडी झालेली आहेत. घरावर पसरलेली फुले असोत की फाटकाजवळील गुलाब सारे मलूल पडले आहे.

ह्या उन्हाळ्यात छोट्या मुलालाही त्या तापत्या हवेच्या झळा समजत आहेत. एक सुरवंट हळुवारपणे गवताच्या पात्यावर चढतो आणि उतरतो आहे. ह्या उन्हाळ्याने साऱ्यांना अगदी शिथिल केलेले आहे. पांढरा कुत्रासुद्धा रांगत जाऊन ओटीमध्ये सावलीत झोपला आहे. पानांची सळसळ नाही, की पक्ष्यांचा किलबिलाटही नाही.

पण हळुहळू आकाशात फरक दिसू लागला आहे. सूर्याचा चकाकता पिवळा रंग आता करडा होऊ लागतोय. सारे काही स्तब्ध आहे. पक्षी, झाडांची पाने त्या करड्या रंगछटेतही स्तब्ध आहेत. वाऱ्याची साधी झुळुकही नाही. पण तरीही ह्या वाढत्या अंधःकारात काहीतरी घडणार आहे. तरीही त्या शांततेत काहीतरी होईल असे त्या छोट्या मुलालाही जाणवते आहे.

तो वाट बघतो आहे आणि त्याला दिसते आहे की काळे ढग जमा होऊ लागले आहेत. ह्या ढगांची सावली सुकलेल्या शेतांवर पसरतेय. रात्रीसारखा काळोख करत एकामागे एक ढग जमा होऊ लागलेत. झाडांमधून येणारी गार वाऱ्याची झुळूक बटरकप, गुलाब आणि साऱ्या फुलांना सुखावत पसरते आहे.

आणि ती चमकली! आकाशात विजेची एक लख्ख झलक इतक्या वेगाने येऊन गेली, की त्यामुळे तो छोटा मुलगा हवेवर डुलणारी फुले पाहूही शकला नाही.

“आईऽऽ, हे बघ काय?” करुन तो जोराने ओरडतो.

“वीज चमकली,” आई सांगते. “आपल्या लँपमध्ये चमकते तशी.” खोलीमध्ये प्रकाश देणाऱ्या लँपची त्याला आठवण झाली आणि आकाशात बघून त्या चमकलेल्या विजेचा विचार सुरु आहे. जंगलात स्वच्छंदी फिरणाऱ्या पांढऱ्या कोल्ह्यासारखी त्याला आकाशातली वीज वाटते. पण खोलीतली वीज तर पाळलेल्या कुत्र्यासारखी, बोलावल्यावर येणारी त्याला वाटतेय.

आता डोंगराच्या मागून कडाड कडकडकडडडडडडड विजेचा कडाकडाट ऐकू येतो.

“हा कसला आवाज?” तो ओरडून आईला विचारतो.

“जेव्हा ढग एकमेकांवर आपटतात तेव्हा असाच कडकडाट होतो.”आई सांगते. अंधारात सारे काही शांत आहे, स्तब्ध आहे आणि पुन्हा एकदा एक वीज चमकते.

विजेचा कडकडाट जसजसा जवळ येतो आहे तसा अंधार वाढतो आहे. पुन्हा ढगांचा गडगडाट होतो अगदी डोक्याच्या वर. आणि पाऊस पडायला सुरुवात होते. पाऊस आणि वाढत्या वाऱ्याने डेजीची फुले जवळपास जमिनीला टेकली आहेत. मोठमोठी झाडेही पावसात डुलायला लागली आहेत.

अंधार झालेल्या वादळीवाऱ्याच्या त्या शहरात खूप दूर एक मुलगा अपले पुस्तक बंद करतो आणि खिडकीत येतो. रस्त्यावर जमलेल्या पाण्यात दुकानांचा उजेड चमकतो आहे. आकाशात वीज चमकल्यावर पसरलेल्या लख्ख प्रकाशात रस्त्यावर डोक्यावर वर्तमानपत्र, छत्री, काहीबाही घेऊन पाऊस आणि वाऱ्यापासून स्वतःला सावरत धावणारी लोक दिसत आहेत.

उंच उंच इमारतींची टोकं त्या अंधारात हवेत लटकल्याप्रमाणे दिसत आहेत. गोल जाळ्यांमध्ये बंद असलेली झाडे जमिनीपासून बाहेर यावीत असे वाटते आहे. वाऱ्यामुळे त्यांची पान सतत फडफडत आहेत. पावसाच्या पाण्यातून जाणाऱ्या गाड्यांचा चाकांचाही सर्रर्र आवाज येतो आहे.

समुद्राच्या लाटांमध्ये एक म्हातारा कोळी उभा आहे. त्याच्या अंगावर आदळणाऱ्या वाऱ्यापावसाचा आवाज भयंकर आहे. त्याचा पूर्ण चेहरा उसळत्या लाटा आणि पावसामुळे भिजला आहे. विजेच्या कडकडाटापुढे कसलाच आवाज येत नाही; ना त्या उसळणाऱ्या लाटांचा, ना त्या कोसळणाऱ्या पावसाचा. जणू काही त्या कडाडणाऱ्या विजेव्यतिरिक्त जगात दुसरे काही नाहीच.

एकदा पुन्हा वीज चमकते आणि घराकडे जायला निघालेला सँडपायपर क्षणार्धात, आकाशात विजेमुळे पसरलेला प्रकाश जायच्या आत लुप्त होतो.

डोंगरांमधून तर एखादया झऱ्याप्रमाणे पाऊस पडतो. प्रत्येकवेळी वीज चमकल्यावर डोंगर फाटल्यासारखे वाटते जणू. पण तरीही ते नंतर तेवढेच शांत आणि निश्चयी दिसतात.

एक तरुण त्याच्या बकऱ्यांना घरी आणतो आहे. त्याची बायको खिडकीतून घोंघावलेले वादळ पहाते आहे आणि तिच्या हातात त्यांचे बाळ शांत झोपले आहे.

छोट्या मुलाच्या खिडक्यांवरही पाऊस कोसळतोय. छतावर सतत टपटप असा पाण्याच्या थेंबांचा आवाज येतोय. झाडांमधून जाणारा जोरदार वारा म्हणजे जणू समुद्राच्या लाटांचा आवाज.

हळुहळू वादळ शांत होते आहे. अंधार कमी होतो आहे. विजांचा कडकडाटही दूर जातो आहे. उजेड वाढतोय. ढग लांब जात आहेत. त्यांचा आवाजही हळुहळू कमी होतोय. छतावर येणारा टपट्प आवाज कमी कमी होत जाऊन बंद झाला आहे. हवा स्वच्छ आणि ताजी आहे, त्यात ओल्या मातीचा गंध दरवळतो आहे.

जोरदार पावसाने गुलाब आणि इतर फुले जमिनीवर पसरली आहेत. डेजीची फुले अजूनही झुकलेली आहेत पण त्यांच्या पाकळ्या एकमेकांना चिकटल्या आहेत. बटरकपची फुले मात्र आता तोऱ्यात उभी आहेत. त्यांच्या कळ्यांवर पडलेले पाण्याचे थेंब मोत्यांप्रमाणे चमकत आहेत.

पिवळ्या रंगाचा एक अनोखा प्रकाश सर्वत्र पसरतोय. तो हळुवार सुंदर प्रकाश पाहून मुलाला कौतुक वाटते आहे. नकळत शिटी वाजवल्याप्रमाणे तो श्वास सोडतो. पक्ष्यांचा किलबिलाट सुरु झाला आहे. ओली, हिरवी पानेहे जणू पक्ष्यांप्रमाणे गात आहेत.

डोलणाऱ्या गवतामध्ये चिवचिवाट करत चिमण्या त्यांचे किड्यामुंग्यांचे खाद्य शोधत आहेत. आता घर, झाडे, झुडुपे आणि पसरलेले मैदान प्रकाशमय होत आहे. घराच्या दरवाज्यात उभ्या असलेल्या मुलाचा चेहराही प्रसन्न दिसतो आहे.

“ते काय आहे?” तो ओरडून आईला विचारतो आहे. ती दरवाज्याजवळ येते आणि आकाशात रंगांनी नटलेला, पसरलेला गोलाकार बघते आहे. आकाशाच्या एका बाजूला, जितक्या दूर आपण पाहू शकतो तिथे असलेले एक टोक मैदाने, डोंगर, झाडे, शहरे पार करत पसरत त्या गोलाकाराचे दुसरे टोक त्या लहान मुलाच्या घराच्या दरवाजाशी आलेले आहे.

“हे तर इंद्रधनुष्य आहे.”आईने सांगितले. “इंद्रधनुष्य आले म्हणजे वादळ शांत झाले.”

हे सांगून त्याला आईने इतक्या हळूवार मिठीत घेतले की त्याला समजलेही नाही. तो गुंग होऊन आकाशाच्या ह्या टोकापासून त्या टोकापर्यंत पसरलेले इंद्रधनुष्य बघत आहे.

पावसाळ्यात गावात, शहरात आणि समुद्रकिनारी जणूकाही वादळ होते. प्राणी, पक्षी, माणसे सर्वजण ढगांच्या आणि पावसाच्या गर्जना ऐकतात. त्यानंतर काहीतरी विशेष घडते.

“मुलांसाठी उत्कृष्ट पुस्तक.”